बारामती पंचायत समिती (जिल्हा पुणे) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१९/प्र.क्र.१३२/बांधकाम-४

५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख: २० डिसेंबर, २०१९

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्रमांक पंसई-२०११/प्र.क्र.७५/पंरा-७, दिनांक ६ मे, २०११.

२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्रमांक पंसई-२०१४/प्र.क्र.२१/पंरा-७, दिनांक ६ सप्टेंबर, २०१४.

३) **शासन परिपत्रक क्रमांक :** ग्राम विकास विभाग क्रमांक योजना-२०१९/प्र.क्र.१३६/ बांध-४, दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९.

४) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांकः** जिप/बांध/प्रकल्प ३/१५९७ अ/२०१९, दिनांक ३० ऑगस्ट, २०१९.

५) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांकः** जिप/बांध/प्रकल्प ३/२२५८/२०१९, दिनांक १९ डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी वाचा मधील अनुक्रमांक ५ येथील पत्रान्वये बारामती पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. बारामती पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ०६ मे, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.३४९.७४ लक्ष एवढ्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती तसेच वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक ०६ सप्टेंबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, बारामती पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या मुळ प्रशासकीय मान्यता रकमेमध्ये रू.९६४.०० लक्ष इतकी वाढ करून रू.१३१३.७५ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सद्यस्थितीत प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पुर्णत्वास येत असून त्या

ठिकाणी फर्निचर व इतर उपकामांची आवश्यकता आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी सादर केलेले पंचायत समिती, बारामती, जि.पुणे येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या फर्निचर व इतर उपकामांचे रू.८६५.१३ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रक सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, पुणे, अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, पुणे व मुख्य अभियंता, सा.बां. विभाग, पुणे यांनी साक्षांकित केलेले आहे.

०३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, बारामती पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत रूपये ८६५.१३ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

बारामती पंचायत समिती, जिल्हा पुणे येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या एकूण रुपये ८,६५,१३,०००/-(रूपये आठ कोटी पासष्ट लक्ष तेरा हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) बारामती पंचायत समितीच्या ठिकाणी, शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार, विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती /जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

०२. बारामती पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे.

| GENRAL ABSTRACT FOR BARAMATI, P.S. FURNITURE & SUB WORK | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| 1 | Providing Third Floor Remaining Electrification Work, Internet, CCTV Generator and Transformer | 24477592.00 |
| 2 | Second and Third Floor Furniture Work | 16619412.00 |
| 3 | Add for Fire Fighting (P+3) | 5910095.00 |
| 4 | Add for Acoustic Planning | 5309850.00 |
| 5 | Compound Wall | 5030730.00 |
| 6 | Add for Improvement of Premises | 5023855.00 |
| 7 | Add for Land Scaping, Garden & Tree Plantation | 1475485.00 |
| | Total | **63847019.00** |
| 8 | Add for Contigency 3 % | 1915410.00 |
| 9 | Add for Insurance 0.5 % | 319235.00 |
| 10 | Add for GST 12% | 7661642.00 |
| 11 | Add for Price Variation 10% | 6384702.00 |
| 12 | Add for Architecture Fees 3% | 1915410.00 |
| 13 | Add for DSR Rate Difference 7% | 4469291.00 |
| | Total | 86512709.00 |
| | **Says Rs.** | **8,65,13,000/-** |

०३. उपरोक्त उपकामांसाठी वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार निधीची मागणी Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे करण्यात यावी व सदर परिपत्रकातील निर्देशानुसार, निधीच्या उपलब्धतेनुसार Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

०५. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका१९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२०१६१२२७३६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2019.12.20 16:30:05 +05'30'

**(रा. ना. सवने)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
७. मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो., मध्यवर्ती इमारत, पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
९. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
१०.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
११.कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, पुणे.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा पुणे.
१३.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१४.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे विभाग, पुणे.
१५.जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे.
१६.सभापती, पंचायत समिती, बारामती जिल्हा पुणे.
१७.गट विकास अधिकारी, पंचायत समिती, बारामती जिल्हा पुणे.
१८.निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.